किनवट पंचायत समिती (जिल्हा नांदेड )
प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास
प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००९/प्र.क्र.१६७/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- ३१ डिसेंबर,२००९

संदर्भ :- कार्यकारी अभियंता, जि.प., नांदेड पत्र क्र.जिपनां/बांउवि/ईमारत/२८३८/०९,दि. ३०.११.२००९

प्रस्तावना :-

कार्यकारी अभियंता, जि.प., नांदेड यांनी संदर्भीय दिनांक ३०.११.२००९ च्या पत्रान्वये किनवट पंचायत समितीची प्रशासकीय इमारत व अन्य बांधकाम मोडकळीस आलेले असून, ते अतिशय जीर्ण झालेले असल्याने, सदर बांधकाम पाडून त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारत बांधण्याच्या प्रस्तावास मान्यता मिळण्याची विनंती केली आहे.

किनवट पचांयत समितीची अस्तित्वात असलेली इमारत सन १९६२-६३ साली बांधण्यात आलेली असून, सदर इमारत, सभागृह व कर्मचारी निवासस्थान हे चुन्याच्या बांधकामात असून, छतासाठी कौलारु शिट वापरात आहे. हे सर्व बांधकाम अतिशय जीर्ण झालेले असून, ते वापरण्यायोग्य नसल्याने जीर्ण इमारतीचे बांधकाम पाडून त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्याचा प्रस्ताव संदर्भीय पत्रान्वये सादर करण्यात आला आहे. या प्रकरणी कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, नांदेड यांनी मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि.यांच्याकडील क्र.टी-एडीएम/५५११ हा नमुना नकाशा उपयोगात आणला असून, एकूण १०२६.५० चौ.मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित केले आहे. सदर प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी रु.१,७४,११,०००/- इतक्या किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक तयार करण्यात आले आहे. सदरील अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारीत असून ते उप अभियंता, जि.प.उपविभाग, किनवट व कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प.,नांदेड यांनी साक्षांकित केले आहे. कार्यकारी अभियंता, जि.प., नांदेड यांनी प्रस्तावासोबत बांधकामाचा नकाशा, जुन्या इमारतीचा ले-आऊट प्लॅन, अस्तित्वातील इमारती जीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र व फोटो इ.कागदपत्रे सादर केलेली आहेत.

कार्यकारी अभियंता, जि.प., नांदेड यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांनी केलेल्या तांत्रिक छाननी अंती, किनवट पंचायत समितीच्या रु.१,७४,११,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

किनवट (जिल्हा-नांदेड ) पंचायत समितीची अस्तित्वातील जीर्ण झालेल्या निवासी /अनिवासी इमारती पाडून त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रक्कम रुपये-१,७४,११,०००/- (रुपये एक कोटी चौऱ्याहत्तर लक्ष अकरा हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

(२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी. प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

(३) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

(४) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

२. किनवट पंचायत समितीच्या नविन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| GENERAL ABSTRACT | | |
|---|---|---|
| Sr. | Work Details | Amount |
| 1 | Construction Cost of Admn. Bldg. | 13175997.00 |
| 2 | 11% For Electrification charge | 1449360.00 |
| 3 | 8 % For External water supply & Sanitation charges | 1054080.00 |
| 4 | 4 % For Contingencies charges | 527040.00 |
| 5 | 2 % For Computerization charges | 263520.00 |
| 6 | 6 % For C.S.R.Rate Changes | 790560.00 |
| 7 | Add for Rain Water Harvesting, Fire Protection & Ramp (LS) | 150000.00 |
| | Total Rs. | 17410557.00 |
| | Say | Rs. 1,74,11,000/- |

३. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.२००९०७०४१८१२३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नांदेड
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद नांदेड
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद नांदेड
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नांदेड
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नांदेड
१०) सभापती, पंचायत समिती, किनवट, जिल्हा नांदेड
११) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, किनवट, जिल्हा नांदेड
१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई